भगवान श्रीशिव, विष्णू तथा सूर्यास दैत्यपुत्रांनी बांधून नेले म्हटल्यावर देव सैन्य अस्तव्यस्त झाले. कित्येक देवता रणांगणी मृत पावल्या. कित्येक गंभीर जखमी होऊन मृतप्राय झाल्या. कोणी दैत्यास शरण गेल्या तर काहींनी ही वार्ता जाऊन आदिशक्तीस सांगितली आणि मग अत्यंतिक क्रोधसंतप्त होत ती महामाया स्वत: रणांगणावर



जाण्यासाठी सिद्ध झाली. स्वत: जगदंबाच येत आहे म्हटल्यावर मदासुरही आपल्या तीनही पुत्रांसह रणमैदानी दाखल झाला. देवीने हाती महाधनुष्य धारण केले. त्यावर प्रत्यंचा चढविली आणि जो टणत्कार केला त्या त्रिभुवनकंपकारी ध्वनीनेच अनेक दैत्य मूर्च्छित झाले. त्यावर जणू उत्तर रूपात मदासुरानेही आपला भयानक शंख वाजविला. त्या ध्वनीने आसमंत व्यापून टाकले. मग देवीनेही आपला शंख वाजवून त्यास प्रत्युत्तर दिले आणि युद्धारंभाचा आदेश दिला.

दैत्याक्रमणाला उत्तर देण्यासाठी कालिका इ. दैवीसेना सिद्ध झाली. त्यांच्या त्रिशुलादिक शस्त्रांनी, शक्तींनी, अस्त्रांनी दैत्यसेनेची दाणादाण उडविली. ते दशदिशात पलायन करू लागले. त्यावेळी त्यांना रोखण्यासाठी मदासुरपुत्र पुढे सरसावले. त्यांनी आपल्या शरवर्षावाने देवतांवर पळण्याची वेळ आणली. त्यावेळी शक्तीने क्रोधपूर्ण रूप धारण केले आणि आपल्या तीन अतिमहत्वाच्या शक्तींना आज्ञा केली. त्या संज्ञा, लक्ष्मी आणि सावित्रीने लीलया धनप्रिया, लोलुप तथा विलासींना बांधून आदिशक्तीच्या पायाशी टाकले.

त्यावेळी स्वत: मदासुरच लढाईसाठी आला. त्याने अतिदारूण शरवर्षाव केला. त्या एका बाणापासून एक भयानक महाबलशाली पुरूष प्रगट झाला. त्याने प्रगटताच देवीच्या सेनेला भक्षिण्यास आरंभ केला. त्याच्या शस्त्रास्त्रांचे तेज इतके भयावह होते की त्यांच्या ज्वालांच्या स्पर्शानेही शक्तींस त्रास होऊ लागला. काही शक्ती मृत झाल्या. काही होरपळल्या. काही पळून गेल्या. त्या सगळ्या जणींनी शेवटी महामायेजवळ आपली अडचण सांगितली. आणि मग परिस्थितीवर नियंत्रण मिळविण्यासाठी स्वत: आदिशक्तीच रणांगणात उतरली. सिंहवाहिनी परांबा आता मदासुराचा सामना करण्यासाठी आली.

तिला समोर पाहताच सर्वप्रथम तर मदासुराने तिला अभिवादन केले. पण नंतर मात्र तो गर्वपूर्ण रीतीने तिला म्हणाला- 'हे आदिमाये! तू तात्काळ देवतांचा पक्ष सोडून आमच्या पक्षात ये. अन्यथा नाईलाजाने मी आज तुझाही वध करीन. कर्माचे फल गहन असते. आज तू माझे पराक्रमशालित्व, पौरूष पाहशीलच.'

महामायेने ते वचन ऐकले आणि प्रत्युत्तर रूपात आपला त्रिशूळ फेकला. दैत्यराजाच्या वधाच्याच मानसिकतेने फेकलेला तो महाभयानक त्रिशुळ त्या राक्षसराजाच्या छातीवर आदळला. मात्र त्या प्रलयंकारी मारानेसुद्धा तो जागचा हालला नाही. अति भयानक गर्जना करून त्याने आदिशक्तीस थेट मल्लयुद्धाचेच आव्हान दिले. देवीनेही घोर रूप धारण करून मल्लयुद्धास आरंभ केला. हाताने हातांना, पायांनी पायांना मारणे सुरू झाले. तीन दिवसपर्यंत हे मल्लयुद्ध सुरू होते. वरदान बलाने शेवटी त्या राक्षसाने शक्ती क्षीण केली तर शारीरिक बलाने तिला दमछाक करून सोडले. ती शेवटी मूर्च्छित पडली आणि मग तिला आणि अन्य शक्तींनाही पकडून विजयी मदासुर आपल्या नगरीत परत आला. काही शक्ती

पळून गेल्या. बाकीच्यांना पकडून मारू पाहणाऱ्या दैत्यसेनेला शेवटी मदासुर म्हणाला. त्या आमुच्या कुलदैवता आहेत. त्यांना मारू नये. मग मदासुराने देवतांनी पळवून नेलेल्या आपल्या पुत्रांना सोडविले. शक्तिलोक जिंकला आणि मग आनंदोत्सव सुरू झाला.

शक्तिलोकातील अलौकिक उपभोगांना भोगत मदासुर तेथे राहिला. अनेकानेक आहार विहारांसह असुरेश्वर 'स्त्रीमांसमदिरासक्त:' या राक्षसीवृत्तीला जवळ करता झाला. मग एका समाधानी क्षणी तो बंदिवासात असलेल्या महामायेस म्हणाला, हे महाशक्ते! माझे मनोरथ पूर्ण झाले आहे. तुला जिंकले. आता त्रिभुवनावर माझी सत्ता आहे. हे निर्बले! आता तू या देवतांसह कुठेही जा. मी तुझा वध करणार नाही. त्याच स्वरूपात त्या मदिरासक्त अवस्थेत त्याने शिव विष्णु सूर्यादि सगळ्यांनाही सोडून दिले व शक्तीला हेही पुन्हा एकदा सांगितले की अजूनही जर तू देवांचा पक्ष सोडून आम्हास भेटशील तर अद्यापही आम्ही तुझी पूजा करू. त्यावेळी म्लानमुखी जगदंबा देवतांसह त्या नगरीला सोडून वनात गेली.

देवता जंगलात, पर्वतगुहात घाबरत घाबरत काळ घालवू लागल्या तर दुसरीकडे मदासुराचे दैत्य देवतांच्या स्थानी बसून स्वर्गीय सुखाचा आनंद घेऊ लागले. बाणासुरादि राक्षस विविध देवतांच्या जागी नियुक्त केले गेले. मदासुराचे तीन पुत्रही शक्तिलोकात तीन उपपदांवर नेमण्यात आले. आणि शेवटी मदासुर विविध स्वर्गीय भोग भोगून आपल्या 'विलासद' नगरीत परतला. त्यानंतर त्याने त्रिपुरासुरास पातालविजयार्थ पाठविले. शेषनागास ही वार्ता कळताच पूर्ववृत्तान्त श्रवण केलेला शेष विनाकारण युद्धाच्या भानगडीत न पडता सरळ शरण आला. खंडणी देण्यास तयार झाला. वार्षिक कारभार देऊन मोकळा झाला. आणि मग खऱ्या अर्थाने मदासूर त्रिभुवनाधिपती झाला. दैव सध्या त्याला अनुकूल होते. समस्त सुखे समोर हात जोडून उभे होती.

***